**साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळ मर्या. मुंबई महामंडळाकडुन राष्ट्रीय मागासवर्गीय वित्तीय विकास महामंडळ, दिल्ली (NSFDC) यांची थकित वसुली रु.८८.२४ कोटी रक्कम भरणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण -२०२१/प्र.क्र. ४०/महामंडळे**
**मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ०३ फेब्रुवारी, २०२२.**

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र शासनाच्या अखत्यारित सामाजिक न्याय व विशेष सहाय्य अंतर्गत अनुसूचित जातीतील दारिद्रय रेषेखालील जीवन जगत असलेल्या लोकांचे जीवनमान उंचावणे, समाज प्रवाहात त्यांना मानाचे स्थान मिळवून देणे, तसेच त्यांचा शैक्षणिक, आर्थिक व सामाजिक विकास घडविण्याच्या दृष्टीने तीन महामंडळे कार्यरत आहेत. महाराष्ट्रामध्ये मागासवर्गीयांपैकी संख्येने मोठया प्रमाणात असलेला मातंग समाज व तत्सम १२ पोटजातींचा आर्थिक, शैक्षणिक व सामाजिक विकास होण्याच्या दृष्टीने आवश्यक असलेल्या कर्ज योजना राबवून त्यांना दारिद्रय रेषेच्यावर आणण्याकरिता राज्य शासनाच्या तसेच राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळाच्या (NSFDC) विविध योजना राबवून गरजू लाभार्थींना स्वयंरोजगार व रोजगार उपलब्ध होणेकरिता कर्जाचे स्वरुपात आर्थिक लाभ देणेकरिता शासनाने भारतीय कंपनी कायदा, १९५६ खाली साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळाची स्थापना झाली. महाराष्ट्रामध्ये मागासवर्गीयांपैकी संख्येने मोठ्या प्रमाणात असलेला मातंग समाज व तत्सम १२ पोटजातीं यांचा आर्थिक, शैक्षणिक व सामाजिक विकास होण्याच्या दृष्टीने आवश्यक असलेल्या कर्ज योजना राबवून त्यांना दारिद्र्यरेषेच्यावर आणणे हा या महामंडळाच्या स्थापनेचा मुख्य उद्देश आहे.

सन १९९३-९४ पासून लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळ हे राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळ, दिल्ली यांची अधिकृत वाहीनी म्हणून कार्यरत आहे. साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळामार्फत राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळाच्या (NSFDC) मुदत कर्ज योजना, लघुत्रऋण वित्त योजना, महिला समृध्दी योजना, शैक्षणिक योजना या योजना राबविल्या जातात. सदर योजनेअंतर्गत महामंडळाने योजनानिहाय मागणी केलेला निधी राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळा (NSFDC) कडुन मंजुर होवून साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळास प्राप्त होतो. राष्ट्रीय

अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळा (NSFDC) कडून लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळास सन २०१९-२० पर्यंत रु.१५३.९१ कोटी निधी कर्ज रुपात प्राप्त झाला असून, दिनांक २ मार्च, २०२१ पर्यंत लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळाने रु.९१.३४ कोटी रक्कमेचा भरणा राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळाकडे (NSFDC कडे) केला आहे.

सन २०१२ ते २०१५ या कालावधीत लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळात झालेला गैरव्यवहार, अनियमितता यामुळे महामंडळाची जनमानसात मलीन झालेली प्रतिमा, आवश्यक कागदपत्रांशिवाय वाटप झालेले कर्ज, भागभांडवली निधीतून मोठा अपहार इत्यादी कारणांमुळे राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळ (NSFDC) कडून घेतलेल्या कर्जाचा भरणा साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळाकडून होवू शकला नाही. (NSFDC) राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळाच्या कर्ज पुरवठ्याला शासनाने वेळोवेळी हमी दिलेली असून आतापर्यंत रु.१५३.०० कोटी रकमेची हमी देण्यात आली आहे.

सदर कर्ज भरण्याबाबत राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळ (NSFDC) यांचेकडून सतत पाठपुरावा करण्यात येत होता. तथापि, साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळाकडे निधी उपलब्ध नसल्याने सदर थकित रकमेचा भरणा करता आलेला नाही. त्यामुळे NSFDC महामंडळाने उच्च न्यायालय (उत्तराखंड) चे माजी न्यायमुर्ती श्री.राजेश टंडन यांच्या लवादाची नेमणुक केलेली असुन आजपर्यंत सदर लवादाच्या ३१ सुनावण्या झालेल्या आहेत.

दिनांक १ मार्च, २०२१ रोजी झालेल्या सुनावणीत लवादाने महामंडळास रु.९३.२४ पैकी तात्काळ रु.५.०० कोटी भरणा करण्याचे आदेश पारित केले असता, महामंडळाने त्यांच्याकडील व्याज खात्यातून राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळास (NSFDC) दिनांक २ मार्च, २०२१ रोजी रु.५.०० कोटी रकमेचा भरणा केलेला आहे.

आता, रु.९३.२४ कोटी रकमेपैकी रु.८८.२४ कोटी इतकी रक्कम राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळास (NSFDC) अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :-

साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळाकडे कर्ज रुपाने थकीत असलेल्या रु.८८.२४ कोटी रक्कम राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळा (NSFDC) कडे भरणा करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने सन २०२२ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात पुरवणी मागणी सादर करुन सदर निधी प्राप्त करुन घ्यावा व तो शासन स्तरावरुन राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळा (NSFDC) कडे भरणा करावा.

२. वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४७१२/अर्थबळ,दिनांक २९.०९.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०३१४३२५०९३२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA NATHA SAVANE

Digitally signed by RAJENDRA NATHA SAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, pseudonym=AE89A440549540E82C5C3FE007D468E20DCA5112, serialNumber=F049989DBBEF93340E9EDD88AF960A0963746D42BAA5C948405B62E821529A99, cn=RAJENDRA NATHA SAVANE
Date: 2022.02.03 14:35:13 +05'30'

**( रा. ना. सवने )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) मा. राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई

(२) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

(३) मा. अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

(४) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई

(५) मा. उपाध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

(६) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

(७) मा. उपमुखमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई

(८) मा. मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय ,मुंबई

(९) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, विधान भवन, मुंबई.

(१०) मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय ,मुंबई

(११) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय , मुंबई.

(१२) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय ,मुंबई

(१३) अपर मुख्य सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय ,मुंबई

(१४) मा.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपुर

(१५) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे

(१६) व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय अनुसूचित जाती वित्त व विकास महामंडळ (NSFDC), १४वा मजला, स्कोप मिनार कोर १ आणि २, लक्ष्मीनगर डिस्ट्रीक्ट सेंटर, लक्ष्मीनगर, दिल्ली-११००९२

(१७) जस्टीस राजेश टंडन, (वरिष्ठ अधिवक्ता, सुप्रिम कोर्ट ऑफ इंडिया), माजी न्यायमुर्ती, उच्च न्यायालय, उत्तराखंड, बी-११, कैलाश कॉलनी, नवी दिल्ली-११००४८

(१८) व्यवस्थापकीय संचालक, साहित्यरत्न लोकशाहीर अण्णा भाऊ साठे विकास महामंडळ मर्यादित, नवीन प्रशासकीय इमारत क्र.२, ३रा मजला, रामकृष्ण चेंबुरकर मार्ग, चेंबुर, मुंबई

(१९) निवड नस्ती- महामंडळे